तांत्रिक सहाय्यक व उप अवेक्षक यांच्या अवेक्षक या पदावरील पदोन्नतीबाबत...

**महाराष्ट्र शासन**

**जलसंपदा विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः याचिका-२२२१/प्र.क्र.७९ (भाग-२)/आ.(तांत्रिक)**

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा रोड,

१५ मजला, नवीन प्रशासकीय इमारत, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.

**दिनांक :- ०९-०८-२०२४.**

**वाचा** :- १. शासन निर्णय, पाटबंधारे व वीज विभाग क्रमांक PER १०६२/१३८०८ - E (२), दि.१६.०९.१९६४

२. शासन निर्णय, पाटबंधारे व वीज विभाग क्रमांक PER १०६५/१९५३-D (२), दि.०७.०६.१९६५

३. शासन अधिसूचना, सामान्य प्रशासन विभाग क्र.एसआरव्ही १०७६/बारा, दि.२१.०६.१९८२

४. शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग क्र.एसआरव्ही-२००२/प्र.क्र.२/२००२/१२, दि.०६.०६.२००२

५. शासन अधिसूचना, सामान्य प्रशासन विभाग क्र.एसआरव्ही.२०१६/प्र.क्र.२८१/बारा, दि.२१.०६.२०२१

**प्रस्तावना :-**

जलसंपदा विभागाने (तत्कालीन पाटबंधारे व वीज विभाग) शासन निर्णय दि.१६.०९.१९६४ अन्वये, तांत्रिक सहायक (Technical Assistant) व उप अवेक्षक (Sub overseers) व सर्वेक्षक (Surveyors) या संवर्गातील कर्मचाऱ्यांना अवेक्षक (Overseers) पदी पदोन्नती देण्यासाठी कार्यपध्दती विहित केली आहे. जलसंपदा विभाग (तत्कालीन पाटबंधारे व वीज विभाग) शासन निर्णय दि.०७.०६.१९६५ अन्वये, शासन निर्णय दि.१६.०९.१९६४ मध्ये सुधारणा करण्यात आली असून, सदर शासन निर्णयान्वये सूचना देण्यात आल्या आहेत की, सर्वेक्षक या पदासाठीची व्यावसायिक परीक्षा ऑक्टोबर व डिसेंबर मध्ये आयोजित करण्यात यावी. सदर परीक्षेचा निकाल पुढील वर्षाच्या जानेवारी महिन्यात घोषित करण्यात यावा आणि उत्तीर्ण झालेल्या कर्मचाऱ्यांना त्या वर्षाच्या ०१ फेब्रुवारीपासून सर्वेक्षक या संवर्गात सामावून घेतले जावे.

सामान्य प्रशासन विभाग शासन अधिसूचना दि.२१ जून, १९८२ अन्वये, महाराष्ट्र नागरी सेवा (ज्येष्ठतेचे विनियमन) नियमावली, १९८२ अधिसूचित करण्यात आले होते. तद्नंतर सामान्य प्रशासन विभाग शासन अधिसूचना दि.२१ जून, २०२१ अन्वये, महाराष्ट्र नागरी सेवा (ज्येष्ठतेचे विनियमन) नियमावली, २०२१ अधिसूचित करण्यात आले आहे. सदर ज्येष्ठतेचे नियम राज्य शासनाच्या सर्व कर्मचाऱ्यांना लागू ठरतात व त्यानुसार कर्मचाऱ्यांच्या सेवाविषयक बाबी हाताळण्यात येतात. त्यामुळे जलसंपदा विभाग शासन निर्णय दि.१६.०९.१९६४ व दि.०७.०६.१९६५ मधील तरतुदी कालबाह्य ठरत असल्याने, सदरचे दोन्ही शासन निर्णय अधिक्रमित करण्याचे शासनाच्या विचाराधीन होते.

**शासन निर्णय:-**

शासन निर्णय, पाटबंधारे व वीज विभाग क्रमांक PER १०६२/१३८०८ - E (२), दि.१६.०९.१९६४ व शासन निर्णय, पाटबंधारे व वीज विभाग क्रमांक PER १०६५/१९५३-D (२), दि.०७.०६.१९६५ हे दोन्ही शासन निर्णय या आदेशाद्वारे अधिक्रमित करण्यात येत आहेत.

२. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२४०८०९१२५१५९५३२७ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

MANGESH
RAMDAS BAGDE

Digitally signed by MANGESH RAMDAS BAGDE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WATER RESOURCES DEPARTMENT,
2.5.4.20=10a4eba53d6cf4eecf749d5d71a069a321cba021994969cce3b86ba15bfeb4a3, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=2E7C3977D5A2A1A7E29FF2889A72947DE46CD8FFC991D80ABDDD9FF5803E9298, cn=MANGESH RAMDAS BAGDE
Date: 2024.08.09 13:07:25 +05'30'

**( मंगेश बागडे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. महालेखापाल-१/२, लेखा व अनुज्ञेयता, महाराष्ट्र, मुंबई/ नागपूर.
२. महालेखापाल-१/२, लेखापरीक्षा, महाराष्ट्र, मुंबई/ नागपूर.
३. मा.उपमुख्यमंत्री (जलसंपदा) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. सर्व कार्यकारी संचालक.
५. सर्व मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग.
६. सर्व अधीक्षक अभियंता.
७. अ.मु.स.(जलसंपदा)/ सचिव (प्रकल्प समन्वय)/ सचिव (लाक्षेवि) यांचे स्वीय सहाय्यक, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
८. कार्यासन (आ (शा.अ.)), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
९. निवडनस्ती आ (तांत्रिक).